**महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर करिता मौजा वारंगा येथील स्थायी कॅम्पस बांधकामामधील उर्वरित इमारतीचे बांधकामे करण्याकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.एनएलयुएन-२०२१/प्र.क्र.०६/विशि-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०२ मे, २०२३.

**पहा :-** १) मा.मंत्रिमंडळाची दि.०८.१२.२०२१ रोजीची बैठक.
२) समक्रमांकाचा दि.१७.१२.२०२१ रोजीचा शासन निर्णय.
३) समक्रमांकाचा दि.०७.०१.२०२२, दि.११.०२.२०२२, दि.२२.०३.२०२२, दि.०८.०७.२०२२, दि.११.०१.२०२३ व दि.२१.०२.२०२३ रोजीचा शासन निर्णय.
४) कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर यांचे दि.२७.०२.२०२३ रोजीचे पत्र.
५) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३

**प्रस्तावना :-** मा.मंत्रिमंडळाच्या दि.०८.१२.२०२१ च्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर करिता मौजा वारंगा, जि. नागपूर येथे नवीन निवासी इमारती बांधकामांकरिता संदर्भ क्र.२ येथील दि.१७.१२.२०२१ च्या शासन निर्णयान्वये रु.९५१५.९७ लक्ष इतक्या अंदाजपत्रकीय रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

उपरोक्त प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन या बांधकामांना संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये एकूण रु.८९.१५ कोटी इतका निधी विद्यापीठास उपलब्ध करुन दिला आहे. आता उर्वरित इमारतीचे बांधकामे जसे १ बीएचके स्टाफ क्वार्टर, निवासी इमारती व पायाभूत सुविधा उभारण्याकरीता निधी उपलब्ध करुन देण्याची विद्यापीठाने संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. संदर्भ क्र.५ यथील वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकान्वये सन २०२३-२४ मधील निधी वितरीत करण्याबाबतच्या सुचना देण्यात आल्या आहेत. सदरहू सुचनेतील अटींच्या अधिन राहुन महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर येथील स्थायी कॅम्पस बांधकामामधील उर्वरित इमारतीचे बांधकामे करण्याकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर करिता मौजा वारंगा येथील स्थायी कॅम्पस मधील इमारतीच्या बांधकामाकरीता दि.१७.१२.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिल्यानुसार, उर्वरित इमारतीचे बांधकामे करण्याकरीता रु.६,००,९७,०००/- (अक्षरी रुपये सहा कोटी सत्याण्णव हजार फक्त) इतका निधी खालील अटींच्या अधिन राहून मंजूर करण्यात येत आहे.

१. महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ अधिनियम २०१४ नुसार शासनाकडून मंजूर झालेले अनुदान हे विद्यापीठ निधीत जमा करुन अनुदानाचे व्यवस्थापन करण्याची जबाबदारी कार्यकारी परिषदेची असेल. तसेच सदर अनुदानातून करण्यात आलेल्या खर्चाचे विनिमय करुन खर्चाच्या लेख्यांचे विवरणपत्र महापरिषदेपुढे ठेवून त्यास मान्यता घेण्याची कार्यवाही विद्यापीठाने करावी.
२. कुलगुरु, महाराष्ट्र राष्टीय विधी विद्यापीठ, नागपूर यांना शासनाकडून ज्या प्रयोजनार्थ अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे, हे अनुदान त्याच प्रयोजनार्थ खर्च करण्यात आले आहे, हे पाहण्याची जबाबदारी कुलगुरु यांची असेल. यासंदर्भात त्यांनी कार्यकारी परिषदेची मान्यता घेऊन त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र उच्च शिक्षण संचालनालयामार्फत शासनास सादर करावे.

३. सदरहू मंजूर झालेली तरतुद महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर यांना तातडीने सुपूर्द करण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. तसेच वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२, नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणीकरीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा. तसेच विहीत कालावधीमध्ये सदरचा खर्च पूर्णपणे करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचेमार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

२. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, प्रधानशिर्ष- २२०२- सर्वसाधारण शिक्षण, ०३- विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०२- विद्यापीठांना सहाय्य, - (००) (२१) विधी विद्यापीठाचा विकास (२२०२ जी ९५९), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२०२४ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५०३१६४४३३४००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2023.05.03 16:50:39 +05'30'

**(अ. म. बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. कुलगुरु, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर
३. उप सचिव, मा. मुख्य सचिव यांचे यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. कुलसचिव, महाराष्ट्र राष्ट्रीय विधी विद्यापीठ, नागपूर.
६. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. सहसंचालक (उच्च शिक्षण), नागपूर विभाग, नागपूर.
९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१०. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -२, महाराष्ट्र, नागपूर
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ नागपूर.
१२. कार्यासन अधिकारी (का-१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. वित्त विभाग,(व्यय-५) (अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.